महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगावरील अस्थायी पदांना मुदत वाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- १५ मार्च, २०२२

वाचा :-

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग विभाग, क्र.-रामाआ-२००३/प्र.क्र.१७५/ मावक-१, दि. १ मार्च, २००५.
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग, क्र:-सीबीसी-१०/२००६/ प्र.क्र.५७६/ मावक ५, दि. २ डिसेंबर, २००६.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१० ऑगस्ट, २०२१.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.:-सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक, दि.१३ सप्टेंबर, २०२१.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२ फेब्रुवारी, २०२२.

प्रस्तावना :-

अनुसूचित जाती/ जमातीच्या सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक, सांस्कृतिक व राजकीय सद्यस्थितीचा अभ्यास करून शासनास उपाययोजना सूचविण्यासाठी सामाजिक न्याय विभागाच्या दि.०१/०३/२००५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोगाची स्थापना करण्यात आली. सदर आयोगावरील २७ अस्थायी पदांची मुदत दिनांक ३१ ऑगस्ट, २०२१ रोजी संपुष्टात येणार होती. त्यास अनुसरून आयोगाच्या २७ अस्थायी पदांना सुध्दा वेळोवेळी संदर्भाधीन शासन निर्णयाअन्वये मुदत वाढ देण्यात आलेली आहे. सदर २७ अस्थायी पदांना संदर्भ-४ येथील दि.१३ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१ सप्टेंबर, २०२१ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदर २७ अस्थायी पदांची मुदतवाढ दि.२८ फेब्रुवारी, २०२२ रोजी संपुष्टात येत असल्यामुळे सदर २७ अस्थायी पदांना आता दिनांक ०१ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

राज्य अनुसूचित जाती/ जमाती आयोगाकरीता अधिकारी/कर्मचारी वर्गाची मंजूर ५३ पदापैकी विवरणपत्रात दर्शवलेली २७ पदे प्रथम टप्प्यात भरण्यास दिनांक २ डिसेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर एकूण २७ अस्थायी पदांना दि.०१ सप्टेंबर, २०२१ ते दि.२८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. आता आयोगाच्या सदर २७ अस्थायी पदांना संदर्भ क्र.५ येथील दि.२२ फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.१ मार्च, २०२२ ते दि.३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत जे आधी घडेल तोपर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या पदावरील येणारा खर्च सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीत तरतुदीमधून "मागणी क्रमांक एन-३, २२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातीचे कल्याण, ८०० इतर खर्च, (०१) (०३) महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती आयोग (२२२५-४०७१) " या लेखाशिर्षातंर्गत भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२(भाग-२)/२००४/वित्तिय सुधारणा-१, दि.४ ऑक्टोबर, २००४ व शासन निर्णय, दि.२२ फेब्रुवारी, २०२२ मधील तरतुदींच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२२०३१५१५२१२२३१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2022.03.15 15:23:44 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई -४०००१८.
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई- ४०००१८.
३) वरीष्ठ संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई- ४०००१८.
४) आयुक्त समाजकल्याण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता / लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी व लेखा अधिकारी, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) उप सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०)उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) निवड नस्ती/का.मावक.

# विवरणपत्र

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक,
दिनांक :- १५ मार्च, २०२२.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या | वेतनश्रेणी (रूपये) |
|---|---|---|---|
| १. | सदस्य सचिव (सह सचिव दर्जा) | १ | (एस-२७) ११८५००-२१४१०० |
| २. | सह संचालक (उप सचिव दर्जा) | १ | (एस-२५) ७८८००-२०९२०० |
| ३. | अतिरिक्त पोलीस अधिक्षक | १ | (एस-२५) ७८८००-२०९२०० |
| ४. | वरीष्ठ संशोधन अधिकारी | १ | (एस-२३) ६७७००-२०८७०० |
| ५. | पोलिस निरिक्षक | २ | ( एस-१८) ४९१००-१५५८०० |
| ६. | स्वीय सहाय्यक | १ | ( एस-१६) ४४९००-१४२४०० |
| ७. | लघुलेखक उच्चश्रेणी | २ | ( एस-१५) ४१८००-१३२३०० |
| ८. | सहाय्यक लेखा अधिकारी | १ | ( एस-१५) ४१८००-१३२३०० |
| ९. | कार्यालयीन अधिक्षक | १ | ( एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १०. | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १ | ( एस-१४) ३८६००-१२२८०० |
| ११. | सांख्यिकी अधिकारी | १ | ( एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १२. | संशोधन सहाय्यक | २ | ( एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १३. | सहाय्यक (विधी) | १ | ( एस-१४) ३८६००-१२२८०० |
| १४. | वरीष्ठ सहाय्यक | २ | ( एस-८) २५५००-८११०० |
| १५. | लिपिक टंकलेखक | २ | (एस-६) १९९००-६३२०० |
| १६. | बिल लिपीक | १ | (एस-६) १९९००-६३२०० |
| १७. | वाहन चालक (कंत्राटी) | २ | ४०००/- |
| १८. | शिपाई | ४ | (एस-१) १५०००-४७६०० |
| | **एकूण पदे** | **२७** | ---- |

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2022.03.15 15:24:05 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**